महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील २२१० जी ८६१ (SCP) या लेखाशिर्षाखाली निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मफुयो-२०२४/प्र.क्र.८१/ई-९५९५९३/आरोग्य-६**
गो.ते. रुग्णालय आवार, १० मजला,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
दिनांक: ३१ मार्च, २०२५.

वाचा :-

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.मफुयो-२०२३/प्र.क्र.१६०/आरोग्य-६, दिनांक २८ जुलै, २०२३
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि. ०१.०४.२०२४ व क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५.०७. २०२४
३) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. बीजीटी-२०२४/प्र.क्र.३९/ अर्थसंकल्प (विघयो), दिनांक २० ऑगस्ट, २०२४
४) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.मफुयो-२०२४/प्र.क्र.८१/आरोग्य-६, दिनांक १२ सप्टेंबर, २०२४
५) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. बीजीटी-२०२४/प्र.क्र.३९/ अर्थसंकल्प, दि. २२ मार्च, २०२५
६) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. लेखाप्र-२०२४/प्र.क्र.२१७/LB/आरोग्य-६, दि. २० फेब्रुवारी, २०२५
७) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. मफुयो-२०२४/प्र.क्र.८१/ई-९५९५९३/ आरोग्य-६, दिनांक २६ मार्च, २०२५
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, वरळी, मुंबई यांचे क्र. राआहसो/ लेखा/काअ/१११७०/३७७/२०२४-२५, दिनांक ०७.०३.२०२५

प्रस्तावना :-

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या संदर्भाधीन १ येथील दि. २८.७.२०२३ च्या शासन निर्णयान्वये महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना व आयुष्मान भारत- प्रधानमंत्री जन आरोग्य योजना या योजना विस्तारित स्वरूपात राज्यात अंमलबजावणी सुरू आहे. सदर योजना दि. ०१.०७.२०२४ पासून पूर्णतः राज्य शासनामार्फत राज्य आरोग्य हमी सोसायटीद्वारे राबविण्यात येत आहे. महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेच्या अंमलबजावणीसाठी सन २०२४-२५ या वित्तीय वर्षासाठी २२१० जी ८६१ (SCP), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पित रु.२०९.७५ कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला होता अर्थसंकल्पीत निधीपैकी रु. १८७.०४ कोटी इतका निधी राज्य

आरोग्य हमी सोसायटीस वितरीत करण्यात आलेला आहे. महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेसाठी शिल्लक असलेल्या निधीमधून अंगीकृत रुग्णालयांचे दावे अदा करण्यासाठी रु.१०,०४,६२,८९०/- (रुपये दहा कोटी चार लक्ष बासष्ट हजार आठशे नव्वद मात्र) इतका निधी राज्य आरोग्य हमी सोसायटीस उपलब्ध करुन देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील दि.२८.७.२०२३ च्या शासन निर्णयानुसार महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेची अंमलबजावणी राज्य आरोग्य हमी आरोग्य सोसायटीमार्फत होत असल्यामुळे उपचाराचा खर्च, अंगीकृत रुग्णालयांना अदा करण्यासाठी रु.१०,०४,६२,८९०/- (रुपये दहा कोटी चार लक्ष बासष्ट हजार आठशे नव्वद मात्र) एवढा सशर्त निधी वितरित करुन राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या ८४४३- नागरी ठेवी, १०६ वैयक्तिक लेखा, (००) (०२) आभासी वैयक्तिक ठेव लेखा खाते यामध्ये, आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक यांच्या नावे सुपुर्द करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरील निधी खालील लेखाशिर्षांतर्गत खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र. एन-०३**

| | | |
|---|---|---|
| २२१० | - | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य |
| ०१ | - | नागरी आरोग्य सेवा - विषम चिकित्सा |
| ७८९ | - | अनुसूचित जाती उप योजना |
| (०१) | - | अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना |
| (०१) (०३) | - | महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना (कार्यक्रम) |
| २२१० जी ८६१ | - | ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (दत्तमत) |

३. महाराष्ट्र शासन वित्त विभाग शासन निर्णय क्र. मुंविनि-२०२२/प्र.क्र.२७/२०२२/विनियम, दिनांक १२.०१.२०२३ मधील खालील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून निधी वितरीत करण्यात येत आहे.

१) सदरचा निधी हा विस्तारीत महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेंतर्गत लाभार्थ्यांच्या आरोग्य संरक्षणापोटी रुग्णालयांच्या दाव्यांच्या अदायगीसाठी करण्यात यावा.

२) सदरचा निधी योजनेंतर्गत अंगीकृत रुग्णालयांचे दावे अदा केल्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र विहीत नमुन्यात आहरण व संवितरण अधिकारी तसेच सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना सादर करावे.

४. राज्य आरोग्य हमी सोसायटी, वरळी, मुंबई या कार्यालयास निधीचा विनियोग करण्यासाठी "आभासी वैयक्तिक ठेव लेखा (Virtual Personal Deposit Account)" ही व्यवस्था संदर्भ क्र. ०६ येथील दिनांक २०.०२.२०२५ च्या शासन निर्णयान्वये लागू केलेली आहे. आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक यांनी वित्त विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.११०/२०२३/कोषा प्रशा-५, दिनांक १४.०२.२०२४ व विभागाच्या संदर्भ क्र. ६ येथील दिनांक २०.०२.२०२५ मधील तरतुदींचे तंतोतंत पालन

करावे. सदर अनुदानाचे देयक अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांच्याकडे सादर करण्यासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी तसेच सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी असतील.

५. वित्त विभागाने परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३,दि.०१ एप्रिल, २०२४ व दिनांक २५.०७.२०२४ सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु. क्र. ८ मधील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटी व शर्तीची पूर्तता केली असल्याचे राज्य आरोग्य हमी सोसायटीने शासनास कळविले असून यापूर्वी शासनाकडून वितरीत केलेल्या निधीचा विनियोग ज्या कारणासाठी निधी मंजूर केला होता त्याच प्रयोजनासाठी केल्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या अंतर्गत नव्याने उघडण्यात आलेल्या आभासी वैयक्तिक ठेव लेखा खाते (Virtual Personal Deposit Account) मध्ये जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक ०१.०४.२०२४ व दिनांक १४.०२.२०२४ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतूदींचे/ अटी व शर्तीचे पालन झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

६. सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी अर्थसंकल्पित केलेल्या तरतूदीतून रु.१०,०४,६२,८९०/- (रुपये दहा कोटी चार लक्ष बासष्ट हजार आठशे नव्वद मात्र) एवढा निधी राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या अंतर्गत नव्याने उघडण्यात आलेल्या आभासी वैयक्तिक ठेव लेखा खाते (Virtual Personal Deposit Account) मध्ये जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक ०१.०४.२०२४, दिनांक २५.०७.२०२४ व दिनांक १४.०२.२०२४ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतूदींचे/अटी व शर्तीचे पालन झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

७. अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध झालेला निधी खर्च करताना सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या दिनांक २०.०३.२०२५ च्या शासन निर्णयामध्ये नमूद सर्व अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन राज्य आरोग्य हमी सोसायटीने करावे.

८. सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या संदर्भ क्र. ५ येथील दिनांक २२.०३.२०२५ च्या शासन निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे..

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३३१११०५३८४८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NEELAM GIRISH SANGWAI

Digitally signed by NEELAM GIRISH SANGWAI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Public Health Department, 2.5.4.20=a9bbc429d62201a67249f70e60acdfad bff901fbbbf45cc393dbd6aa91fbd6ca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=81e4e52421d72a2ae32df6c7d06 abb4e6a7b5820c3a929f328ad6c0dca4f38c7, cn=NEELAM GIRISH SANGWAI
Date: 2025.03.31 11:49:49 +05'30'

(नीलम संगवई)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता, मुंबई.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, मुंबई.
६. संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
७. सहसंचालक, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
८. प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई (३ प्रती).
९. नियोजन विभाग (कार्यासन१४७२), मंत्रालय, मुंबई.
१०. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग (अर्थसंकल्प),मंत्रालय,मुंबई.
११.वित्त विभाग, कार्यासन - व्यय -१४, मंत्रालय, मुंबई-३२.
१२.अर्थसंकल्प शाखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती.